**केंद्र पुरस्कृत योजना सन २०२०-२०२१**
**“व्याघ्र प्रकल्प” योजनांतर्गत मेळघाट व्याघ्र प्रकल्पातील मालुर गांवाच्या पुनर्वसनासाठी निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०७.२०/प्र. क्र. १०९ /फ-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- १२ ऑक्टोंबर, २०२०.

वाचा :-

१. केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक ४-१ (१०)/२०११-पीटी, दिनांक १०.०७.२०१९.
२. केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक ४-१ (१०)/२०१९-पीटी, दिनांक २७.१२.२०१९.
३. केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक : ४-१(१०)/२०१८-पीटी(Vol. II), दिनांक: १४.०१.२०२०.
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी त्यांचे पत्र क्रमांक कक्ष-१/सी/यो/प्र.क्र. १०/MTR/१६०१/१९-२०, दिनांक २२.०१.२०२०.
५. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी -०१.२० / प्र.क्र.३४ / फ-१, दिनांक ०६.०३.२०२०.
६. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल, २०२०.
७. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. ०४ मे, २०२०.
८. वित्त विभाग, परिपत्रक क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.६७/कोषा-प्रशा-५, दि. २६ मे, २०२०.
९. केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक ४-१(१०)/२०१८-पीटी(Vol. II), दिनांक:- १३.०७.२०२०.
१०. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपुर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष- १/सी/यो/प्र.क्र.१०/MTR/२०१९-२०/०९/२०२०-२०२१,दिनांक : १६.०७.२०२०.

प्रस्तावना :-

सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षाकरिता केंद्र पुरस्कृत योजना-व्याघ्र प्रकल्प अंतर्गत मेळघाट व्याघ्र प्रकल्पाच्या विकासाकरीता केंद्र शासनाने संदर्भीय पत्र क्रमांक १ व २ अन्वये सर्वसाधारण घटक, अनुसुचित जाती उपयोजना व आदिवासी क्षेत्र उपयोजना अंतर्गत आवर्ती व अनावर्ती बाबींकरीता एकूण रु. १८९१.५० लक्षचे कार्यबाबींस मंजूरी प्रदान केली आहे.

२. संदर्भ क्रमांक ३ च्या पत्रान्वये केंद्रिय पर्यावरण, वन व हवामान बदल मंत्रालय, नवी दिल्ली यांनी सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षाकरिता केंद्र पुरस्कृत योजना-"व्याघ्र प्रकल्प" योजनेअंतर्गत मेळघाट व्याघ्र प्रकल्पातील मालुर गावातील ३०३ कुटुंबांचे पूनर्वसनाकरीता रु. ३०३०.०० लक्षचा अतिरीक्त वार्षिक प्रवर्तन अहवाल मंजूर केला असून केंद्र हिस्स्याअंतर्गत रु. १०९०.०० लक्ष निधी वितरीत केला आहे. त्या अनुरुप राज्य हिस्स्याअंतर्गत रु. ७२७.०० लक्ष निधी वितरीत करणे अपेक्षित होते.

३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये शासन मान्यतेसाठी सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने संदर्भ क्रमांक ५ च्या शासन निर्णयान्वये मेळघाट व्याघ्र प्रकल्पातील मालुर गावाच्या पुनर्वसनासाठीकेंद्र हिस्स्याअंतर्गत रु. १०९०.०० लक्ष व अनुरुप राज्य हिस्स्याअंतर्गत रु. ७२७.०० लक्ष असे एकूण रु. १८१७.०० लक्ष निधी वितरीत करण्यात आला होता. तथापि केंद्र हिस्सा ६०% २४०६-१२४३ या लेखाशिर्षाअंतर्गत रु. ८५०.०० लक्ष तर त्या अनुरुप राज्य हिस्सा ४०% २४०६ A१०२ या लेखाशिर्षाअंतर्गत रु. १२७.०० लक्ष असे एकूण रु. ९७७.०० लक्ष सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षात निधी खर्च करणे शक्य झालेले नाही. सन २०१९-२०२० मधील सदर अखर्चित रक्कम रु. ९७७.०० लक्ष सन २०२०-२०२१ मध्ये खर्च करण्यास केंद्र शासनाने संदर्भ क्रमांक ९ च्या पत्रान्वये मंजूरी प्रदान केली आहे.

४. सन २०२०-२०२१ मध्ये निधी वितरणाच्या अनुषंगाने वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदशक सुचनान्वये प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपुर यांनी संदर्भ क्रमांक १० च्या पत्रान्वये शासन मान्यतेसाठी सादर केलेला प्रस्ताव नियोजन विभाग व वित्त विभागाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला असता वित्त विभागाने दिलेल्या अभिप्रायानुसार निधी वितरीत करणे अपेक्षित आहे.

## शासन निर्णय

सबब आता सदर शासन निर्णयान्वये **रु. ९७४.०२५ लक्ष** निधी संदर्भ क्रमांक ९ च्या पत्रान्वये केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांनी मान्यता दिलेल्या कार्यबाबींवर खर्च करण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

I. मेळघाट व्याघ्र प्रकल्पातील मालुर गावातील ३०३ कुटुंबांचे पूनर्वसनाकरीता होणारा खर्च **I)** अनावर्ती बाबींसाठी केंद्र हिस्सा ६०% करीता रु. ८५०.०० लक्ष लेखाशिर्ष क्र. २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, केंद्र पुरस्कृत योजना (००)(०४) व्याघ्र प्रकल्प (६० % केंद्रीय अनुदान) (२४०६ १२४३) **II)** त्या अनुरुप राज्य शासनाचा राज्य हिस्सा ४० % करीता रु. १२४.०२५ लक्ष लेखाशिर्ष

क्र. २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजना (००)(२१) व्याघ्र प्रकल्प (४० % राज्य हिस्सा) (२४०६ ए१०२) सन २०२०-२०२१ मध्ये अर्थसंकल्पित वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध होणा-या अनुदानातून खर्च करण्यात यावा.

II. सदर शासन निर्णयान्वये विरतीत केलेला निधी केंद्र शासनाने संदर्भीय पत्रान्वये मान्यता दिलेल्या तपशीलवार कार्यबाबींवर व सदर कामांना सक्षम प्राधिका-याची प्रशासकीय व तांत्रिक मान्यता असल्याखेरीज रक्कम खर्ची टाकण्यात येऊ नये.

III. वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच केंद्र शासनाने प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

IV. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक : १६.०४.२०, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दिनांक : ०४.०५.२०२० व वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक : संकीर्ण-२०२०/प्र.क्र.६७/कोषा-प्रशा-५, दिनांक : २६.०५.२०२०. चे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक २०७/व्यय-१०, दिनांक ०७.०८.२०२० ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०१२१५३४०३२९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAJENDRA PRAKASH NARWANE

Digitally signed by GAJENDRA PRAKASH NARWANE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=088951d0088e627aa56c9ab088add1677b8ac27d637c5cdf80b730f756dce9e8, cn=GAJENDRA PRAKASH NARWANE
Date: 2020.10.12 15:42:45 +05'30'

**(गजेंद्र नरवणे)**
उप सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व, नागपूर.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती.
६. महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षण /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).